**हिंजवडी ते शिवाजीनगर मेट्रो रेल्वे प्रकल्पासाठी शासकीय दूध योजना, पुणे येथील दुग्धव्यवसाय विभागाची ७.१४ हे. इतकी जमीन महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: दुवियो-१३१८/प्र.क्र.११३/पदुम-९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०६ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ** - १) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक पीएमआरडीए-३३१५/प्र.क्र.६९/नवि-७, दि.९.२.२०१८

२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास कार्यालयाचे पत्र क्र. आदुवि -१६ (८) / प्र.क्र.१९/पुणे मेट्रो प्रकल्प /२०१९ /२१५४,दि.१४.०९.२०२०.

३) महानगर आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र. EG/मेशादुह/ प्र.क्र.०४१/ १०.२०/ ५३८/ शाखा-०१, दि.१४.१०.२०२०.

**प्रस्तावना-**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये हिंजवडी ते शिवाजीनगर मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या उभारणीस मान्यता देण्यात आली आहे.सदर प्रकल्पाकरीता दुग्धव्यवसाय विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय दूध योजना, पुणे येथील मौजे भांबूर्डा (शिवाजीनगर), ता.पुणे शहर, जि.पुणे येथील भुमापन क्र.१६ /१, १७/१, १८/ब, १९/क, २१/२, २२-ब, २२-क मालमत्ता क्र.२१ व २२ असे मिळून एकूण क्षेत्र अंदाजे १२ हे.६१ आर. या जागेपैकी जुन्या पुणे-मुंबई महामार्गाच्या पश्चीमेकडील ७.१४ हे. इतके क्षेत्र वाणिज्यिक विकास करण्यासाठी कायमस्वरुपी कब्जेहक्काने हस्तांतरीत करावयाचे आहे. या संदर्भात वेळोवेळी मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, प्रधान सचिव, नगर विकास व प्रधान सचिव, पदुम यांचेस्तरावर बैठक/व्हिडीओ कॉन्फरन्सींग यांच्या स्तरावर बैठका घेण्यात आल्या आहेत.

सदर बैठकांमध्ये ठरल्यानुसार संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये शासकीय दूध योजना, पुणे येथील ७.१४ हे.इतकी जमीन हिंजवडी ते शिवाजीनगर मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या उभारणीसाठी पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास हस्तांतरीत करण्याच्या मोबदल्यात प्राधिकरणाने शासकीय दूध योजनेच्या जमीनीवर अस्तित्वात असलेल्या इमारती पाडून शासकीय दुग्ध योजना, पुणे यांच्या गरजा विचारात घेऊन, आधुनिक पध्दतीने पुनर्विकास बांधकाम करुन देण्याचा प्रस्ताव आयुक्त, दुग्धव्यवसाय यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला. सदर प्रस्तावानुसार सदर ठिकाणी प्रतिदिन ५०००० लिटर क्षमता असलेली अत्याधुनिक दुग्धशाळा उभारणी तसेच नविन प्रशासकीय इमारत व अधिकारी/कर्मचारी निवासस्थाने बांधून देण्यासाठी रु.८८,८५,८९,१७३.०० इतक्या रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी सादर केला आहे.

संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे यांनी शासकीय दूध योजना, पुणे येथील ७.१४ हे. जमीन हस्तांतरणाच्या बदल्यात दुग्धशाळेच्या जमीनीवरील

अस्तित्वातील इमारती पाडून शासकीय दुग्ध योजना, पुणे यांच्या गरजा विचारात घेऊन, प्राधिकरणामार्फत अस्तित्वातील क्षेत्रफळ आधूनिक पध्दतीने पुनर्विकास बांधकाम करुन देण्याची हमी शासनास दिली आहे. तसेच यासाठी आवश्यक तो MOU करण्याबाबतही शासनास कळविण्यात आले आहे. सदर प्रकरणी वेळोवेळी उच्च स्तरावर झालेल्या बैठका तसेच आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी सादर केलेला प्रकल्प अहवाल व महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे यांनी दिलेली हमी लक्षात घेता, मौजे भांबूर्डा (शिवाजीनगर), ता.पुणे शहर, जि.पुणे येथील भुमापन क्र.१६ /१, १७/१, १८/ब, १९/क, २१/२, २२-ब, २२-क मालमत्ता क्र.२१ व २२ असे मिळून एकूण क्षेत्र अंदाजे १२ हे.६१ आर. या जागेपैकी जुन्या पुणे-मुंबई महामार्गाच्या पश्चीमेकडील ७.१४ हे. इतके क्षेत्र वाणिज्यिक विकास करण्यासाठी कायमस्वरुपी कब्जेहक्काने हस्तांतरीत करण्यासाठी महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

शासन या निर्णयान्वये दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय दूध योजना, पुणे येथील मौजे भांबूर्डा (शिवाजीनगर), ता.पुणे शहर, जि.पुणे येथील भुमापन क्र.१६ /१, १७/१, १८/ब, १९/क, २१/२, २२-ब, २२-क मालमत्ता क्र.२१ व २२ असे मिळून एकूण क्षेत्र अंदाजे १२ हे.६१ आर. या जागेपैकी जुन्या पुणे-मुंबई महामार्गाच्या पश्चीमेकडील ७.१४ हे. इतके क्षेत्र वाणिज्यिक विकास करण्यासाठी कायमस्वरुपी कब्जेहक्काने हस्तांतरीत करण्यासाठी महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर जमिनीच्या हस्तांतरणाच्या मोबदल्यात संदर्भ क्र. ३ येथील महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे यांनी दर्शविलेल्या हमीनुसार शासकीय दूध योजना, पुणे यांच्या गरजा लक्षात घेऊन अस्तित्वातील इमारती पाडून आधुनिक पध्दतीने बांधकाम करुन देणे आवश्यक आहे. संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी सदर ठिकाणी आवश्यक असलेल्या बांधकामाचा सादर केलेला सविस्तर प्रकल्प अहवाल महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे यांना प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे यांनी उपलब्ध करुन द्यावा. तसेच यासंदर्भात आवश्यक सामंजस्य करार (MOU) करण्याची कार्यवाही महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे यांनी तात्काळ करावी व तसा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६१७३५३६०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UJWAL B SALVI

Digitally signed by UJWAL B SALVI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=e79d2f5f5638bc425097a84cb982b7efabb779ca09f8d7e378b31d8b16f334
04, postalCode=400032, street=MANTRALAY,MUMBAI,
serialNumber=afb80c2a93ec4b5d3af7ba8e63d39d2640d6b904c2f831c1a4402b194
9b33009, ou=AGRICULTURE AND ADF, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=UJWAL B SALVI
Date: 2020.11.06 17:38:08 +05'30'

**( उज्ज्वल साळवी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, (नवि-१), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महानगर आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,पुणे.
८) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
९) जिल्हाधिकारी, पुणे
१०) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे.
११) दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना,पुणे.
१२) निवड नस्ती, पदुम-९.